अपर जिल्हा अधिकारी, ठाणे यांचे मुख्यालय ठाणे येथून जव्हार येथे स्थानांतरीत करण्यात आल्यामुळे जव्हार मुख्यालयी बदलून जाणा-या शासकीय अधिकारी/कर्मचा-यांना मिळणा-या विशेष सवलती.

महाराष्ट्र शासन,
वित्त विभाग,
शासन निर्णय क्र. घभाभ-१०९२/प्र.क्र. २७९/सेवा-५,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.

दिनांक: १ मार्च ., १९९३.

पहा :- शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्रमांक-आरईएन-२७९२/४००५/प्र.क्र. १९४/म-१०, दिनांक २७ जानेवारी, १९९३.

शासन निर्णय :-

आदिवासी उपाय योजना क्षेत्रातील दुर्गम भागासाठी जाहीर केलेल्या विविध योजनांची अंमलबजावणी करणे सुलभ व्हावे म्हणून अपर जिल्हा अधिकारी, ठाणे यांचे कार्यालय जव्हार येथे स्थानांतरीत करण्यात आलेले आहे. जव्हार येथे निवास विषयक सुविधा पुरेशा प्रमाणात उपलब्ध नसल्यामुळे जव्हार येथील मुख्यालयी स्थानांतरीत झालेल्या शासकीय अधिकारी/कर्मचा-यांना काही विशेष सवलती मंजूर करण्याचा प्रश्न शासनाच्या विचाराधीन होता. शासन आता असा आदेश देत आहे की, ज्या शासकीय अधिकारी/कर्मचारी यांची ठाणे येथून स्थलांतर झालेल्या अपर जिल्हाधिकारी कार्यालय जव्हार यांच्या कार्यालयात बदली करण्यात येईल त्या शासकीय अधिकारी/कर्मचा-यांना खालीलप्रमाणे विशेष सवलती देण्यात येतील.

[१] शासकीय अधिकारी/कर्मचा-यांना ३ वर्षाच्या कालावधीसाठी भाडेरहित शासकीय निवासस्थाने पुरविण्यात यावीत. ज्या शासकीय अधिकारी/कर्मचा-यांना शासकीय निवासस्थाने पुरविण्यात येणार नाहीत, त्यांना भाडेरहित निवासस्थाना-ऐवजी मिळणारा घरभाडे भत्ता शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. घभाभ -१०९०/प्र.क्र. १०/सेवा-५, दिनांक ५ फेब्रुवारी, १९९० व शासन निर्णय, वित्त विभाग क्र. घभाव-१४८९/४०/सेवा-५, दिनांक ३० डिसेंबर, १९९१ प्रमाणे अनुज्ञेय होईल.

[२] ज्या शासकीय अधिकारी/कर्मचा-यांना त्यांच्या जुन्या

[ कृ.मा.प. ]

मुख्यालयी शासकीय निवासस्थाने पुरविण्यात आली आहेत, असे अधिकारी/कर्मचारी त्यांचे कुटुंब जुन्या मुख्यालयी ठेऊ इच्छित असतील तर अशा शासकीय अधिकारी/कर्मचाऱ्यांना मुंबई नागरी सेवा नियम ८४९ [बी] मधील तरतूदीनुसार व शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक-घमाव-१४८९/४०/सेवा-५, दिनांक ३० डिसेंबर, १९९१ अनुसार जव्हार येथील नवीन मुख्यालयी रूजू झाल्याच्या तारखेपासून एक वर्षापर्यंत सवलतीच्या दराने शासकीय निवासस्थानाचे भाडे देऊन शासकीय निवासस्थान ठेऊन घेता येईल.

[३] ज्या शासकीय अधिकारी/कर्मचारी यांना जुन्या मुख्यालयी शासकीय निवासस्थाने पुरविण्यात न आल्यामुळे घरभाडे भत्ता अनुज्ञेय आहे, अशा अधिकारी/कर्मचारी यांना स्वतःचे कुटुंब जुन्या मुख्यालयी ~~(XXXXXXXXX)~~ ठेऊन, त्याबाबत मुंबई नागरी सेवा नियम ३४४ अनुसार प्रमाणपत्र सादर केल्यास जव्हार येथील नवीन मुख्यालयी रूजू झालेल्या तारखेपासून एक वर्षापर्यंत जुन्या मुख्यालयी असलेला घरभाडे भत्ता अनुज्ञेय होईल.

२. उपरोक्त आदेश दिनांक १ फेब्रुवारी, १९९३ पासून लागू आहेत व ते पुढील ३ वर्षांपर्यंत म्हणजे दिनांक ३१ जानेवारी, १९९६ पर्यंत अंमलात राहतील.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

[ मंगला मं. कोरगांवकर ]
उप सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रति,

१] महालेखापाल-१ [ लेखा व अनुज्ञेयता ], महाराष्ट्र, मुंबई.
२] महालेखापाल-२ [ लेखा व अनुज्ञेयता ], महाराष्ट्र, नागपूर.
३] महालेखापाल-१ [ लेखा परीक्षा ], महाराष्ट्र, मुंबई.
४] महालेखापाल-२ [ लेखा परीक्षा ], महाराष्ट्र, नागपूर.
५] अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.

......

६] निवासी लेखा अधिकारी, मुंबई.

७] राज्यपालांचे सचिव.

८] मुख्यमंत्र्यांचे सचिव.

९] सर्व मंत्री, राज्यमंत्री व उपमंत्री यांचे खाजगी सहाय्यक.

१०] [illegible]युक्त, कोकण विभाग, नवी मुंबई.

११] कोकण विभागातील सर्व जिल्हाधिकारी,

१२] जिल्हा कोषागार अधिकारी, ठाणे.

१३] उप कोषागार अधिकारी, जव्हार, ठाणे.

१४] कोकण विभागातील सर्व विभाग प्रमुख.

१५] सर्व मंत्रालयीन विभाग.

१६] वित्त विभागातील सर्व कार्यासने,

१७] निवड नस्ती, वित्त विभाग, सेवा-५.